आदिवासी विकास सेवेतील गट-अ, वर्ग-१, श्रेणी-१ मधील पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नत्या देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग,

**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : आस्था-२००५/प्र.क्र.१८१/का.१५**

मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.

**दिनांक : २३ नोव्हेंबर, २०१०**

**वाचा :-** १) शासन आदेश समक्रमांकित दिनांक ४ एप्रिल, २००६

२) सामान्य प्रशासन विभाग यांचे पत्र क्र.एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.२६१/१०/१२, दि.११.१०.२०१०.

**<u>शासन शुद्धिपत्रक</u> :- श्री.टी.बी.पाडवी, प्रकल्प अधिकारी,** एकात्मिक आदिवासी प्रकल्प, यावल यांच्या पदोन्नतीच्या संदर्भाधिन दि. ४.४.२००६ च्या आदेशामध्ये अंशत: बदल करण्यात येत असून सदर शासन आदेशातील परिच्छेद ४ मधील परिस्थिती सामान्य प्रशासन विभागाच्या निदर्शनास आणण्यात आली नसल्यामुळे त्यानुषंगाने परिच्छेद ८ मध्ये दर्शविलेली सामान्य प्रशासन विभागाची सहमती त्यासाठी लागू ठरत नाही. त्यामुळे परिच्छेद ८ मध्ये नमूद करण्यात आलेली सहमती परिच्छेद ४ मधील अटीपुरती वगळण्यात येत आहे. मात्र उर्वरीत परिच्छेदांबाबत सामान्य प्रशासन विभागाची परिच्छेद ८ मधील सहमती लागू राहील.

२. सदर शुद्धिपत्रक तात्काळ अंमलात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. दि. सुर्यवंशी )
उप सचिव

**प्रति,**

**प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.**

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक

अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर

सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, नाशिक.

महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक / नागपूर

संबंधित अधिकारी

**प्रत, माहितीसाठी :-**

मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.

मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.

मा.सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहायक.

सर्व सहसचिव/उपसचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक.

सर्व कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग.

निवड नस्ती (का.१५)

E:\C.R.२०१०\C.R.१५१ to २०० C.R.१८१-२०१०.lwp